अल्पसंख्याक विकास विभागासाठी निर्माण करण्यात आलेल्या एकूण ६६ विविध संवर्गातील अस्थायी पदांना सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात चालू ठेवण्याकरिता मुदतवाढीस मंजूरी देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्र.अविवि-२०१७/प्र.क्र.३८/का-१**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : - १३ मार्च, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र शाकानि- १००८/प्र.क्र.४/२००८ /१८(रवका), दि.२१ फेब्रुवारी, २००८

२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२००८/प्र.क्र.१९२/का-१ दि.२७ जानेवारी, २००९

३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१०/प्र.क्र.१०/का-१, दि.१२ जानेवारी, २०१०

४) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.५७/२०१५/विसु-१, दि.१४.०१.२०१६

५) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.नियुक्ती-२०१५/प्र.क्र.१४६/का-१ दि.०७.१२.२०१६

६) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१७/प्र.क्र.३८/का-१ दि.१२.०३.२०१८

७) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१७/प्र.क्र.३८/का-१ दि.२९.०९.२०१८

८) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२१.०२.२०१९

९) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१७/प्र.क्र.३८/का-१ दि.१०.१०.२०१९

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.१२.०२.२०२०

**शासन निर्णय :-**

शासनाने उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन अधिसूचना दि.२१/२/२००८ अन्वये स्वतंत्रपणे अल्पसंख्याक विकास विभागाची नव्याने निर्मिती केली आहे. या नवनिर्मित विभागाकडे इतर विभागांकडून हस्तांतरित झालेले विषय व या विभागाने सन २००८-०९ या वर्षामध्ये नव्याने निर्माण केलेल्या योजना या सर्व बाबींचा विचार करुन या विभागासाठी रचना व कार्यपध्दतीनुसार एकूण ९ कार्यासनांची निर्मिती प्रस्तावित करुन एकूण ६९ विविध संवर्गातील अस्थायी पदांची आवश्यकता विचारात घेण्यात आली. त्यापैकी सामान्य प्रशासन विभाग, महसूल व वन विभाग, पर्यटन व सांस्कृतीक कार्य विभाग आणि रोजगार व स्वयंरोजगार विभागाकडून एकूण २७ पदे हस्तांतरित झालेली आहेत तर उर्वरीत ४ पदे पर्यटन व सांस्कृतीक कार्य विभागाकडून हस्तांतरीत न झाल्याने सदर ४ पदे वित्त विभागाच्या मान्यतेने व उच्च स्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने वरील संदर्भाधील क्र.३ मधील दि.१२.१.२०१० च्या शासन निर्णयान्वये नव्याने निर्माण करण्यात

आली आहेत. तसेच सन २००८-०९ मध्ये वरील संदर्भाधीन क्र.२ मधील दि.२७/१/२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकूण ३८ विविध संवर्गातील नव्याने अस्थायी पदे निर्माण करण्यात आली असून त्यानुसार विभागामध्ये विविध संवर्गातील ६९ पदे कार्यरत होती.

२. तथापि, वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील दि. १४.०१.२०१६ च्या शासन निर्णयास अनुसरुन शिपाई संवर्गातील एकूण १३ मंजुर पदांपैकी रिक्त असलेली एकूण ४ पदांपैकी २५% पदे म्हणजेच ३ पदे संदर्भ क्र. ५ अन्वये निरसित करण्यात आली आहेत. त्यामुळे विभागातील एकूण ६९ अस्थायी पदांमधून ३ पदे कमी झालेली आहेत. उर्वरित ६६ पदांचा तपशील सोबतच्या प्रपत्र-अ मध्ये दर्शविण्यात आलेला आहे. सन २०१९-२०२० या वर्षात सदर ६६ पदांना दि.२९.०२.२०२० पर्यंत संदर्भ क्र.९ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

३. विभागातील कामकाजाची निकड विचारात घेता सदरहू अस्थायी पदे सन २०२०-२१ मध्ये चालू ठेवणे आवश्यक आहे. संदर्भ क्रमांक-१० मध्ये नमूद केलेल्या वित्त विभागाच्या दि.१२.०२.२०२० च्या शासन निर्णयानुसार अस्थायी पदे दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० या कालावधीमध्ये चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्याकरिता प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. विभागाच्या ६६ पदांपैकी काही पदे पदोन्नती/बदली/सेवानिवृत्तीमुळे रिक्त झालेली आहेत. सद्यस्थितीत एकूण ५१ विविध संवर्गातील पदे कार्यरत आहेत. तर उर्वरीत रिक्त पदे भरण्याबाबत कार्यवाही करण्यात येत आहे. त्यामुळे अल्पसंख्याक विकास विभागातील एकूण ६६ विविध संवर्गातील अस्थायी पदे सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० या कालावधीमध्ये पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. उपरोक्त बाबींवर होणारा खर्च मुख्यलेखाशिर्ष " मागणी क्र.झेड-ई-१, २०५२- सेक्रेटरीएट-सर्वसाधारण, ००, ०९० सेक्रेटरीएट (००) (०१) अल्पसंख्याक विकास विभाग (२०५२-०६२-४) " दत्तमत सन २०२०-२१ या वर्षासाठी मंजूर झालेल्या /होणाऱ्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००३१३११३६४१८०१४ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.03.13 17:48:35 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मुख्य सचिव.
४. अ.मु.सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय , मुंबई- ४०० ०३२

६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय , मुंबई- ४०० ०३२
७. सह सचिव / उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय , मुंबई- ४०० ०३२
८. उप सचिव (कार्यासन-१४)(कार्यासन-१४-अ) (कार्यासन-१४-ब), सामान्य प्रशासन विभाग
९. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
१०.संचालक, संचालनालय लेखा व कोषागारे, कुटीर क्र.१५ व १६, बॅरेक्स , मंत्रालय समोर, मुंबई
११.उप संचालक, संचालनालये लेखा व कोषागरे (संगणक), ५ वा माळा, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१२.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१३.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई
१४.महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा), नागपूर
१६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७.अधिदान व लेखा अधिकारी (नियंत्रण शाखा), वांद्रे, मुंबई
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१९.सर्व कार्यासने, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२०.निवडनस्ती/संग्रहार्थ (कार्यासन-१)

शासन निर्णय क्र.अविवि-२०१७/प्र.क्र.३८/का-१, दि. १३ मार्च, २०२० सोबतचे
अल्पसंख्यांक विकास विभाग (खुद्द) ची मंजूर पदे, भरलेली पदे व रिक्त पदे याबाबतचे विवरण

प्रपत्र "अ"

| अ.क्र. | पदनाम/संवर्ग | मंजूर पदे | भरलेली पदे | रिक्त पदे |
|---|---|---|---|---|
| १. | प्रधान सचिव | १ | १ | ० |
| २. | सह सचिव | १ | १ | ० |
| ३. | उप सचिव | १ | १ | ० |
| ४. | अवर सचिव | ४ | २ | २ |
| ५. | कक्ष अधिकारी | ८ | ७ | १ |
| ६. | वरिष्ठ स्वीय सहाय्यक | १ | १ | ० |
| ७. | उच्चश्रेणी लघुलेखक | ४ | ४ | ० |
| ८. | निम्नश्रेणी लघूलेखक | २ | १ | १ |
| ९. | अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी | १ | १ | ० |
| १०. | सहायक कक्ष अधिकारी | १० | १० | ० |
| ११. | सहायक लेखा अधिकारी | १ | ० | १ |
| १२. | संशोधन सहायक | २ | १ | १ |
| १३. | उप संपादक (उर्दू) | १ | ० | १ |
| १४. | लेखापाल | १ | ० | १ |
| १५. | रोखपाल | १ | १ | ० |
| १६. | लिपिक-टंकलेखक | १३ | १० | ३ |
| १७. | देयक लिपिक | २ | १ | १ |
| १८. | वाहन चालक | २ | १ | १ |
| १९. | नाईक | २ | १ | १ |
| २०. | रोनियो ऑपरेटर | १ | १ | ० |
| २१. | झेरॉक्स ऑपरेटर | १ | १ | ० |
| २२. | शिपाई | ६ | ५ | १ |
| | एकूण | ६६ | ५१ | १५ |